१३ व्या वित्तीय आयोगांतर्गत एसएनसीयु/ एनआयसीयु Neonatal Ventilator उपकरणे खरेदी करण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१७/प्र.क्र.२३१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००0१.
दिनांक : ०६ जून, २०२२.

वाचा :-

(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-२०१७/प्र.क्र. २३१/आ-७, दिनांक : ०२ ऑगस्ट, २०१७.

(२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : जा.क्र. राकुकका/बालआरोग्य/कक्ष १५क/१३ वा वित्त आयोग/मंजूर निधी/५५६२७-३०/२०१७, दिनांक : ०७.०९.२०१७.

(३) हाफकीन जीव-औषध निर्माण महामंडळ (मर्यादित), मुंबई यांचे पत्र क्रमांक : ४७९६/ हाफकीन खरेदी कक्ष/E-4186/Neonatal Ventilator/२०२१-२२,दिनांक : २९.०४.२०२२.

(४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : राकुकका/बालआरोग्य/कक्ष १५ क/Neonatal Ventilator उपकरणे खरेदीबाबत (सुधारीत शासन निर्णय)/३८९७४-७६/२०२२, दिनांक: २३.०५.२०२२.

प्रस्तावना:-

संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयातील अ.क्र. ४.b.१ अंतर्गत १३ व्या वित्तीय आयोगांतर्गत रुपये १०.०० लक्ष प्रति Neonatal Ventilator प्रमाणे एकूण १६ Neonatal Ventilator उपकरणे खरेदीकरीता रुपये १६०.०० लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले. तसेच, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये अ.क्र. ४.b.२ अंतर्गत अधिकचे ०७ Neonatal Ventilator खरेदी करण्यासाठी रुपये १५.०० लक्ष प्रति Neonatal Ventilator प्रमाणे रुपये १०५.०० लक्ष इतक्या अनुदानास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असल्याचे कळविले. अशाप्रकारे एकूण २३ Neonatal Ventilator खरेदीचा प्रस्ताव खरेदी कक्ष, मुंबई कार्यालयास पाठविण्यात आला असता, खरेदी कक्ष मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन क्रमांक (३) च्या पत्रान्वये हाफकीन जीव-औषध निर्माण महामंडळ, मुंबई अंतर्गत सदरहू २३ Neonatal Ventilator खरेदी करीता निविदा क्र. ई-४१८६ प्रसिध्द करण्यात आल्यानंतर निविदाच्या दराचा लिफाफा उघडण्यात आला असता, न्युनतम दर रुपये

१३,६४,८३२/- प्रमाणे निविदा समितीने Neonatal Ventilator खरेदी करण्यास मान्यता दिली असल्याचे कळविले. तथापि, संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयातील प्रशासकीय मान्यतेनुसार १६ नगाकरीता निधी अपूरा पडत असून, प्राप्त न्युनतम दर प्रति नग रुपये १३,६४,८३२/- इतका आहे. यास्तव, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (४) अन्वये कळविल्यानुसार उक्त २३ Neonatal Ventilator खरेदीकरीता मंजूर करण्यात आलेल्या रुपये २६५.०० लक्ष इतक्या निधीतून एकूण ११ जिल्ह्याकरीता १९ Neonatal Ventilator खरेदी करण्यासाठी रुपये २५९.३२ लक्ष इतक्या सुधारीत अनुदानास पुनःश्च प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कु.क.मा.सं. व शा.आ. पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार २३ Neonatal Ventilator खरेदीकरीता मंजूर करण्यात आलेल्या रुपये २६५.०० लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. सदर निधीतून एकूण ११ जिल्ह्याकरीता १९ Neonatal Ventilator खरेदी करण्यासाठी रुपये २,५९,३१,८०८/- (रुपये दोन कोटी एकोणसाठ लक्ष एकतीस हजार आठशे आठ फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे :-

**१३ व्या वित्त आयोगाअंतर्गत एसएनसीयु/एनआयसीयु Neonatal Ventilator उपकरणांची प्रति नग रुपये १३,६४,८३२/- याप्रमाणे एकूण १९ नग खरेदी करण्याबाबतचे विवरण..**

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | एसएनसीयु/एनआयसीयु नांव | नगांची सख्या | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | स्त्री रुग्णालय, गडचिरोली | ०१ | १३,६४,८३२/- |
| २ | अमरावती | स्त्री रुग्णालय, अमरावती | ०२ | २७,२९,६६४/- |
| ३ | अकोला | स्त्री रुग्णालय, अकोला | ०२ | २७,२९,६६४/- |
| ४ | बुलढाणा | जिल्हा रुग्णालय, बुलढाणा | ०२ | २७,२९,६६४/- |
| ५ | जालना | स्त्री रुग्णालय, जालना | ०१ | १३,६४,८३२/- |
| ६ | परभणी | स्त्री रुग्णालय, परभणी | ०२ | २७,२९,६६४/- |
| ७ | सांगली | शासकीय वैद्य.महा. विद्यालय, मिरज | ०१ | १३,६४,८३२/- |
| ८ | सांगली | पीव्हीपीजीएच, सांगली | ०३ | ४०,९४,४९६/- |
| ९ | नाशिक | जिल्हा रुग्णालय, नाशिक | ०२ | २७,२९,६६४/- |
| १० | नंदुरबार | जिल्हा रुग्णालय, नंदूरबार | ०२ | २७,२९,६६४/- |
| ११ | पुणे | जिल्हा रुग्णालय, पुणे | ०१ | १३,६४,८३२/- |
| **एकूण..** | | | **१९** | **२,५९,३१,८०८/-** |

उक्त तक्त्यात दर्शविण्यात आल्याप्रमाणे एकूण १९ नगांसाठी रुपये २,५९,३१,८०८/- (रुपये दोन कोटी एकोणसाठ लक्ष एकतीस हजार आठशे आठ फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) सदर उपकरणे व सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर प्रक्रिया खरेदी कक्ष, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या स्तरावर करण्यात यावी.

(२) सदरहू उपकरणे व सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

(३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त झालेल्या निधीतून भागविण्यात यावा.

(८) प्रमाणपत्र (Reconcillation Certificate) संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे यांनी सादर करावे.

(९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला

उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४ नियम क्र. ७ समोरील स्तंभ क्र. ६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(१२) हाफकीन जीव-औषध निर्माण महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या निर्देशानुसार प्रति Neonatal Ventilator करीता न्युनतम दर रुपये १३,६४,८३२/- प्रमाणे आवश्यक असलेल्या एकूण १९ नगाकरीता आवश्यक असणा-या सुधारीत प्रशासकीय मान्यता अथवा निधी व पुरवठा यांची यादी सादर करण्यात येईल.

(१३) प्रक्रीया पूर्ण झाल्यानंतर, खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. तसेच, सदर प्रकरणी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : खरेदी-२०१६/प्र.क्र. २४०/आरोग्य-८, दिनाक : २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अ.क्र. (१) ते (१३) येथे नमूद केलेल्या अटीं व शर्तीची पूर्तता करण्याची, तसेच विषयाधीन खरेदी ही नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे, हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांची राहील.

०३. सदर शासन निर्णय हा, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४, नियम क्रमांक-७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०४१५०९३१५३१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.06.06 11:05:38 +05'30'

**(वि. ल. लहाने)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

(२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे.

(३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

(४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.

(५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.

(६) उप संचालक, पुणे/नाशिक/औरंगाबाद/अकोला/नागपूर.

(७) जिल्हा शल्य चिकित्सक गडचिरोली/अमरावती/अकोला/बुलढाणा/जालना/परभणी/सांगली/ नाशिक/नंदुरबार/पुणे.

(८) वैद्यकीय अधिक्षक, स्त्री रुग्णालय, गडचिरोली/अमरावती/अकोला/बुलढाणा/जालना/ परभणी.

(९) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/अमरावती/अकोला/बुलढाणा/जालना/परभणी/सांगली/ नाशिक/नंदुरबार/पुणे.

(१०) निवडनस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.